राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत तळोधी (बाळापूर) नळ पाणी पुरवठा योजना, ता.नागभीड,जि.चंद्रपूर योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-१४१४/प्र.क्र.७२ /पापु-१३

मंत्रालय,मुंबई-४०००३२

तारीख: ०६ सप्टेबर,२०१४

**वाचा -**

१) शासन निर्णय ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७,दि.०९/१०/२०१३

२) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठीच्या सुधारित मार्गदर्शक सुचनांबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि. ०९/०७/२०१४.

३) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि. ०९/०७/२०१४.

४) शासन पत्र क्रमांक/ग्रापापू-१४१३/प्र.क्र.२५४, दि.०७/१२/२०१३ रोजीचे पत्र

५) सदस्य सचिव,म.जी.प्रा. मुंबई यांचे पत्र क्र.मजीप्रा/मनिसंवसंकक्ष)/ ग्रामीण/CR-२६४ /२१४,दि.२१/०३/२०१४.

**प्रस्तावना -**

तळोधी (बाळापूर),ता.नागभीड,जि.चंद्रपूर या नळ पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावास **संदर्भाधिन अनु क्र.४ मधील** पत्रनाव्ये तत्वत: मान्यता देण्यात आलेली असून सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबईयांनी दि.१२१/०३/२०१४ रोजी तांत्रिक मान्यता दिलेली आहे.

प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.५७०.७५ लक्ष (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रक व आराखड्यास प्रशासकीय मंजूरी मिळण्यासाठी सदर योजनेचा प्रस्ताव शिफारशीसह सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई यांनी शासनाच्या मान्यतेकरीता सादर केलेला आहे. त्यामुळे तळोधी (बाळापूर),ता.नागभीड,जि.चंद्रपूर या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

वरील प्रस्तावनेच्या अनुषंगाने तळोधी (बाळापूर),ता.नागभीड,जि.चंद्रपूर या **रु.३,६२४ /-** (उद्भव ३ कि.मी. अंतरावारील असल्याने येणारा दरडोई खर्च) एवढ्या दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या **रु. ५,७०,७५,५२५ /-(रु.पाच कोटी सत्तर लक्ष पंच्याहत्तर हजार पाचशे पंचेवीस फक्त )** इतक्या ढोबळ किमतीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास **प्रशासकीय मान्यता** देण्यात येत आहे.

**२.** संदर्भाधिन अनु क्र.३ मधील शासन निर्णयाद्वारा ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी आकारण्यात येत असलेली लोकवर्गणी पूर्णत: रद्द करण्यात आलेली आहे. त्यामुळे प्रस्तुत योजनेच्या

अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरित करण्यात येणारा निधी हा संदर्भाधिन अनु क्र.३ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील..

३. **सदर योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

१. प्रस्तुत योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्यामार्फत करण्यात यावी असा जिल्हा परिषद,चंद्रपूर यांचा ठराव घेण्यात यावा. योजना यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे, यांची खात्री ग्रामपंचायतीने करावयाची असून योजना पुर्ण होऊन चाचणी झाल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती **ग्रामपंचायत / ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती / संदर्भाधिन अनु.क्र.२ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे संबधित कंत्राटदारामार्फत** करण्यात यावी.

२. प्रस्तुत योजनेसाठी पाणी आरक्षणाबाबत लोणवाही (कान्पा) प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेअंतर्गत मौजे तळोधी गावासाठी सन १९९७ मध्ये प्राप्त असलेल्या पाणी आरक्षणासाठी नव्याने प्रस्ताव सादर करणे आवश्यक आहे किंवा कसे याबाबत जलसंपदा विभाग,नागपूर यांच्याकडून खातरजमा करुन त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

३. जलशुद्धीकरण केंद्रासाठी जमीन प्राप्त झाल्याशिवाय योजनेसाठीच्या निविदा बोलाविण्यात येऊ नयेत.

४. योजनेच्या अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरित करण्यात येणारा निधी हा संदर्भाधिन अनु क्र.३ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.

५. योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधीत ग्रामपंचायतीने योजनेच्या अंमलबजावणीसाठी **किमान रु.१४००/- प्रति वर्ष प्रति कुटुंब एवढी पाणीपट्टी निश्चित करावी व कालपरत्वे त्यात वाढ करण्यात यावी.** योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.

६. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

७. गाव हगणदारीमुक्त करण्याबाबत प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. योजनेची कामे कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने करण्यात यावीत.

९. योजनेतील कामे टप्प्या-टप्प्याने करावीत.

१०.जास्त किंमतीच्या निविदा स्वीकृत करण्यापुर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी. विभागाची परवानगी प्राप्त झाल्याशिवाय योजनेची कामे सुरु करण्यात येऊ नये.

११. अस्तित्वातील स्त्रोतांचे बळकटीकरण करण्यात यावे.

१२.योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणी पट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहील, याबाबत जिल्हा परिषदेच्या/ मजीप्राच्या अधिका-यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना सविस्तर माहिती स्पष्टपणे दयावी, व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरवात करावी.

१३. सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची , राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांच्या तसेच संदर्भाधिन अनु.क्र.२ मधील शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वांची पुर्तता करण्यात यावी.

१४. या योजनेवर होणारा खर्च हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाअंतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०५१३३८५७३५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMBEKAR SURESH D

Digitally signed by AMBEKAR SURESH D
DN: CN = AMBEKAR SURESH D, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2014.09.06 16:26:21 +05'30'

**सु.दे.आंबेकर**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. मा. राज्यमंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.०३२ ४००-
३. सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य
४. विभागीय आयुक्त,अमरावती विभाग,नागपूर
५. सदस्य सचिव,मजीप्रा,मुंबई.
६. जिल्हाधिकारी,चंद्रपूर
७. संचालक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,चंद्रपूर.
९. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,सिडको भवन,बेलापूर
१०. मुख्य अभियंता,मजीप्रा,ना.व ग्रा.योजना,ठाणे.
११. जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,जिल्हा चंद्रपूर.
१२. अधिक्षक अभियंता,भारत निर्माण कक्ष,विभागीय आयुक्त कार्यालय,चंद्रपूर.
१३. अधिक्षक अभियंता,मजीप्रा,ना.व ग्रा. योजना मंडळ,चंद्रपूर.
१४. कार्याकारी अभियंता,म.जी.प्रा. ना. व ग्रा. योजना विभाग,चंद्रपूर.
१५. कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद,चंद्रपूर.
१६. महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
१७. महालेखापाल,महाराष्ट्र-२,नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
१८. प्रधान सचिव,पा.पु.व स्व.वि.यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
१९. मु.अ.तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुबई.
२०. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग कार्यासन क्र. १,४,५,६,९,१७ व १८.
२१. निवडनस्ती पापु-१३,पा.पु.व स्व.वि.मंत्रालय,मुंबई.